महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परिक्षेद्वारे सरळसेवेने नियुक्त होणा-या गट अ व गट ब मधील अधिका-यांच्या एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमाबाबत....

**मार्गदर्शक सूचना**

महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग

शासन निर्णय क्रमांक : टिआरएन-०५१४/ प्र.क्र. १८/१८-ब

मंत्रालय, मुंबई - **४०० ०३२.**

दिनांक : ८ ऑगस्ट, २०१४.

**वाचा :**

१. शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन-०९/ प्र.क्र. ३९/०९/१२-अ, दिनांक २३.९.२०११.

२. शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन-२०१३/ प्र.क्र. ८४/१३/१२-अ, दिनांक २०.१.२०१४.

३. शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन-२०१४/ प्र.क्र. ९९/१४/१२-अ, दिनांक ९.५.२०१४.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परीक्षेद्वारे सरळसेवेने गट अ आणि गट ब मधील नियुक्त होणा-या विविध १९ संवर्गातील अधिका-यांचा एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम अनुक्रमे यशदा, पुणे आणि वनामती, नागपूर या प्रशिक्षण संस्थांमार्फत सुरु करण्याबाबतचा निर्णय शासनाने उपरोक्त अनुक्रमांक २ वर नमूद केलेल्या शासन निर्णयान्वये घेतलेला आहे. सन २०१४ च्या तुकडीतील अधिका-यांसाठी एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यासंदर्भात उपरोक्त अनुक्रमांक ३ येथे नमूद केलेल्या शासन निर्णयान्वये मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत. या मार्गदर्शक सूचनांमध्ये प्रशिक्षणार्थी परिवीक्षाधीन अधिका-यांना प्रशिक्षण कालावधीत ठोक वेतन अदा करण्याचे आणि परिवीक्षाधीन कालावधी पूर्ण झाल्यानंतर संबंधित विभागाकडे हजर झाल्यावर या उमेदवारांच्या दोन वर्षाच्या परिवीक्षाधीन कालावधीत अदा करण्यात आलेल्या ठोक वेतनाची रक्कम आणि प्रत्यक्ष वेतन यामधील फरकाची रक्कम संबंधित विभागांकडून आवश्यक ते समायोजन केल्यानंतर (जसे भविष्य निर्वाह निधी अंशदान, व्यवसाय कर, आयकर इ.) एक रकमी अदा करण्यात येईल, असे निर्देश देण्यात आलेले आहेत.

२. या आदेशांमध्ये आता अंशतः बदल करुन शासन असे आदेश देत आहे की. परिवीक्षाधीन उमेदवारांचे टप्पा १ चे ८ आठवड्यांचे "पायाभूत प्रशिक्षण" आणि त्यानंतर ६ आठवड्यांची "अनिवार्य संलग्नता" असे १४ आठवड्यांचे प्रशिक्षण

पूर्ण झाल्यानंतर हे परिवीक्षाधीन अधिकारी टप्पा ३ च्या, “व्यावसायिक खातेनिहाय/ तांत्रिक प्रशिक्षणा” साठी संबंधित विभागाकडे जेव्हा रुजू होतील तेव्हापासून त्यांना विभाग़ामार्फत नियमित वेतन अदा करण्यात यावे. एखाद्या विभाग़ाकडे टप्पा ३ च्या प्रशिक्षणासाठी पर्याप्त सुविधा नसेल अशा विभागाच्या नियंत्रणाखालील अधिका-यांचे प्रशिक्षण जरी प्रशिक्षण संस्थेमार्फत घेण्यात येणार असले तरी, ज्या दिनांकास हे प्रशिक्षण, प्रशिक्षण संस्थेमार्फत सुरु करण्यात येईल त्या दिनांकापासून उमेदवारांना नियमित वेतन संबंधित विभाग़कडून अदा करण्यात येईल. तसेच, आधीच्या कालावधीत अदा केलेले ठोक वेतन आणि नियमित वेतन यातील फरकाची रक्कम देखील एक रकमी तात्काळ अदा करण्यात येईल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१४०८०८१८०१२९४३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Santosh Haridas Bhogle

Digitally signed by Santosh Haridas Bhogle
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Santosh Haridas Bhogle
Date: 2014.08.08 17:59:32 +05'30'

( डॉ. संतोष भोगले )

उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई - ३२,

२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२,

३) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२,

४) अपर मुख्य सचिव, गृह विभाग, जागतिक व्यापार केंद्र, मुंबई - ३२,

५) अपर मुख्य सचिव, कृषि व प.दु.म. विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२,

६) प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२,

७) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२,

८) प्रधान सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मुंबई - ३२,

९) प्रधान सचिव (वित्त), लेखा व कोषागारे, मंत्रालय, मुंबई - ३२,

१०) महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे,

११) सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२,

१२) सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१३) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (**पत्राद्वारे),

१४) सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.

१५) अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.

१६) प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.

१७) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई - ३२,

१८) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई - ३२,

१९) सर्व मा. विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई - ३२,

२०) सर्व मा. विधान परिषद सदस्य, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई - ३२,

२१) संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन संस्था (वनामती), नागपूर,

२२) सहसचिव(अर्थसंकल्प), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,

२३) उप सचिव (व्यय ४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,

२४) निवडनस्ती कार्यासन १८-ब/ १२-अ.